महिला व बाल विकास विभाग व सामाजिक न्याय व विशेष सहाय विभागांतर्गतच्या महत्वाच्या कार्यक्रमांचा विशेष अभ्यास करण्यासाठी अभ्यासगट स्थापन करणेबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकीर्ण-२०१७/प्र.क्र.२०६ /अर्थ-७.**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
तारीख: ३१ मे, २०१७

## शासन निर्णय

**प्रस्तावना:-**

महिला व बाल विकास विभाग व सामाजिक न्याय व विशेष सहाय विभाग या विभागांच्या अधिपत्याखालील कार्यरत असलेल्या व जनतेच्या दृष्टीने महत्वाच्या आणि बांधिल खर्चाच्या केंद्र सहाय्यित / पुरस्कृत कार्यक्रमांचा केंद्र हिश्श्याचा निधी केंद्र शासनाकडून वेळेवर व पुरेशा प्रमाणात उपलब्ध होण्यात अडचणी येत असल्याच्या बाबी निदर्शनास आल्या असून परिणामी राज्य हिश्श्याचा जास्त निधी वितरीत करावा लागत आहे. तसेच अशा योजनांची उपयोगिता प्रमाणपत्रे केंद्र शासनास सादर करण्याबाबतही काही समस्या आहेत. त्याचप्रमाणे केंद्र शासनाने मर्यादित संख्येत लाभार्थ्यांना मदत देण्याबाबत तयारी दर्शविली असताना प्रत्यक्षात राज्यात लाभार्थ्यांची संख्या जास्त असल्यामुळे राज्यास अतिरिक्त भार सोसावा लागत आहे. त्याचप्रमाणे काही कार्यक्रमांना केंद्रिय कार्यक्रम म्हणून संबोधण्यात येत असले तरी प्रत्यक्षात असे कार्यक्रम राज्य कार्यक्रम असल्याचे निदर्शनास येत आहे. तसेच बऱ्याच वेळा विभागाकडून प्रक्षेपित (Projected) केला जाणारा मूळ खर्च व संबंधित योजनांवर होणारा प्रत्यक्ष खर्च (Actual) यातही तफावत आढळते. त्यामुळे वारंवार पुरवणी मागणीव्दारे अतिरिक्त तरतूद करणे राज्य शासनास भाग पडते. सदर परिस्थितीत लाभार्थ्यांना मिळणारे लाभ विहित कालावधीत मिळत नसल्याच्या तक्रारी प्राप्त होतात. त्यामुळे अशा कार्यक्रमांसाठी आवश्यक निधीचे सुव्यवस्थित नियोजन करुन व त्यामधील त्रुटी / उणिवा शोधून त्यांचे निराकरण करण्यासाठी विशेष अभ्यास गट गठीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय -**

महिला व बाल विकास विभाग व सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग या विभागांच्या अधिपत्याखाली कार्यरत असलेल्या व जनतेच्या दृष्टीने महत्वाच्या आणि बांधील खर्चाच्या खालील नमूद कार्यक्रमांसाठी आवश्यक निधीचे सुनियोजन करणे व लाभार्थ्यांना विहित कालावधीत लाभ देण्याच्या अनुषंगाने त्यामधील त्रुटी / उणिवा शोधून त्यांचे निराकरण करण्यासाठी विभागनिहाय अभ्यास गट स्थापन करण्यात येत आहेत.

| अ.क्र. | विभाग | कार्यक्रम |
|---|---|---|
| १. | महिला व बाल विकास विभाग | I. एकात्मिक बाल विकास सेवा (ICDS) अंतर्गत<br>१. पोषण आहार<br>२. अंगणवाडी कर्मचाऱ्यांचे मानधन.<br>II. एकात्मिक बाल संरक्षण योजना (ICPS) अंतर्गत<br>१. शासकीय / स्वयंसेवी संस्थांची बालगृहे, निरिक्षणगृहे<br>२. स्वसंसेवी संस्थांची शिशुगृहे<br>३. स्वयंसेवी संस्थांची खुली निवारागृहे<br>यांच्यावरील परिपोषण आहार, मानधन व वेतन यावरील खर्च |
| २. | सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग | १. इंदिरा गांधी राष्ट्रीय वृध्दापकाळ निवृत्ती वेतन योजना (केंद्र हिस्सा)<br>२. इंदिरा गांधी राष्ट्रीय विधवा निवृत्ती वेतन योजना (केंद्र हिस्सा)<br>३. इंदिरा गांधी राष्ट्रीय विकालांग निवृत्ती वेतन योजना (केंद्र हिस्सा)<br>४. संजय गांधी निराधार अनुदान योजना (राज्य कार्यक्रम)<br>५. श्रावणबाळ सेवा राज्य निवृत्तीवेतन योजना (राज्य कार्यक्रम)<br>६. अनुसूचित जातीच्या विद्यार्थ्यांना भारत सरकार मॅट्रीकोत्तर शिष्यवृत्ती योजना (केंद्र पुरस्कृत)<br>७. इतर मागासवर्गीय विद्यार्थ्यांसाठी भारत सरकार मॅट्रीकोत्तर शिष्यवृत्ती योजना (केंद्र पुरस्कृत)<br>८. सफाई कामगारांच्या मुलांना भारत सरकार मॅट्रीकपूर्व शिष्यवृत्ती योजना (केंद्र पुरस्कृत) |

२ विभागनिहाय अभ्यासगटाची रचना पुढीलप्रमाणे राहील :-

(अ) महिला व बाल विकास विभागांतर्गतच्या कार्यक्रमांसाठी अभ्यासगट:-

१. श्री. ज.अ. शेख, उपसचिव (वित्त विभाग) तथा सचिव, महाराष्ट्र राज्य अल्पसंख्याक आयोग — गटप्रमुख

२. श्रीमती स्मिता द.निवतकर, उपसचिव (अर्थसंकल्प), महिला व बालविकास विभाग — सदस्य

३. श्रीमती. मं.अ.कारंडे, अवर सचिव, नियोजन विभाग. — सदस्य

४. श्री.य.अ.साटम, सहा. लेखाधिकारी, वित्त विभाग — सदस्य

(ब) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागांतर्गत कार्यक्रमांसाठी अभ्यासगट -

१. श्री. विवेक दहिफळे, सहसचिव, वित्त विभाग — गट प्रमुख.

२. श्री.भा.र.गावित, सहसचिव (अर्थसंकल्प), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग — सदस्य

३. श्री. सु. शं. शिंदे, अवर सचिव , नियोजन विभाग — सदस्य

४. श्री. रा .भि. सांळुखे, सहा. लेखाधिकारी — सदस्य

३. वरील अभ्यासगट कार्यक्रमनिहाय पुढील बाबींची छाननी करील १) कार्यक्रमांबाबत वेळोवेळी निर्गमित केलेले शासन निर्णय. २) केंद्र शासनाच्या मार्गदर्शक सूचना ३) केंद्र/राज्य हिश्श्याचे प्रमाण ४) त्यानुसार केंद्र/राज्याने मागील तीन वर्षामध्ये वितरीत केलेले अनुदान व केंद्र शासनाकडून प्राप्त अनुदान ५) अर्थसंकल्पात तरतूद करण्यात आलेला निधी व लाभार्थ्यांची संख्या यामधील संबंध ६) लाभार्थ्यांना निधी वेळीच प्राप्त होण्यात येणाऱ्या अडचणी व त्याकरीता करावयाची उपाययोजना (७) यासाठी इतर राज्यांना केंद्र शासनाने वितरीत केलेला निधी व राज्यास अधिकचा निधी प्राप्त करण्याकरीता करावयाची उपाययोजना. (८) योजनेच्या इतर अनुषंगीक बाबी.

४. सदर अभ्यासगट कार्यक्रम निहाय अहवाल ३ आठवडयात अपर मुख्य सचिव (वित्त) यांना सादर करतील.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक २०१७०५३११३२८४७४००५ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vasant K. Patil

Digitally signed by Vasant K. Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=FINANCE DEPT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=16a60323ef3beff915e7cf13b9836a7df2ad6df610965aab153a71bdb81c36c1, cn=Vasant K. Patil
Date: 2017.05.31 13:35:04 +05'30'

(व. कृ. पाटील)
सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१.मा. राज्यपाल यांचे सचिव
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन
४. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
५. अपर मुख्य सचिव (व्यय), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
६. प्रधान सचिव (ले. व को./वित्तीय सुधारणा), मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
७. प्रधान सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
८. प्रधान सचिव ,अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
त्यांना विनंती करण्यात येते की, अभ्यास गटाच्या कामकाजासाठी श्री. ज.अ.शेख, सचिव, महाराष्ट्र राज्य अल्प संख्याक आयोग यांना आवश्यकतेनुसार कार्यमुक्त करण्याबाबत सूचित करण्यात यावे.
९. सचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
१०. सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
११. मा. मंत्री (वित्त व नियोजन), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
१२. मा. राज्यमंत्री (गृह (ग्रामीण),वित्त व नियोजन), यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
१३. सचिव, महाराष्ट्र राज्य अल्प संख्याक आयोग.
१४. निवडनस्ती (अर्थसंकल्प-७), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.